तलाठी संवर्गाच्या सेवाजेष्ठतेत एकसूत्रता आणण्याकरीता अभ्यासगट स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.२६८/ई-१०**

पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : १७ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

मा. मंत्री (महसूल) व मा. अ.मु.स.(महसूल) यांना महाराष्ट्र राज्य तलाठी पटवारी मंडळाधिकारी समन्वय महासंघाने सादर केलेल्या दिनांक २०/१०/२०२१ रोजीच्या निवेदनावर चर्चा करण्यासाठी अ.मु.स.(महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २२/१०/२०२१ रोजी मुंबई येथे बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या चर्चेनुसार व निदेशानुसार तलाठी संवर्गाचे नियुक्ती प्राधिकारी उपविभागीय अधिकारी असल्याने त्यांची प्राथमिक सेवाज्येष्ठता सूची उपविभागस्तरावर ठेवण्यात येते. मात्र, मंडळ अधिकारी पदावरील पदोन्नतीच्यावेळी सदरची सूची जिल्हास्तरावर एकत्रित करुन सुधारीत सेवाज्येष्ठता सूची ठेवण्यात येते. सदर सेवाज्येष्ठता सूचीमध्ये उदभवणाऱ्या अडचणी लक्षात घेता सेवाज्येष्ठतेत एकसुत्रता आणण्याकरीता निश्चित काय कार्यपध्दती असावी याबाबतचा अहवाल तसेच त्यासंदर्भातील शिफारस शासनास करण्यासाठी उपआयुक्त, कोकण विभाग, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली “अभ्यास गट” स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्यानुषंगाने असा अभ्यास गट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील तलाठी व मंडळ अधिकारी यांच्या सेवाज्येष्ठता तयार करतांना उदभवणाऱ्या अडचणी व सेवाज्येष्ठतेत एकसुत्रता आणण्याकरीता निश्चित काय कार्यपध्दती असावी याबाबतचा अहवाल तसेच त्यासंदर्भातील शिफारस शासनास सादर करण्याकरीता खालीलप्रमाणे अभ्यासगट स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| (१) उपायुक्त (महसूल) कोकण विभाग | अध्यक्ष |
| (२) निवासी उपजिल्हाधिकारी, अमरावती | सदस्य |
| (३) निवासी उपजिल्हाधिकारी, औरंगाबाद | सदस्य |
| (४) श्री. संजय अनव्हाने (मंडळ अधिकारी), जि. नागपूर | सदस्य |
| (५) श्री. नारायण रावसाहेब गाढे (तलाठी), जि. नांदेड | सदस्य |
| (६) श्री. महेश सुर्यवंशी (तलाठी), जि. कोल्हापूर | सदस्य |

२. सदर अभ्यास गटाने आपला अहवाल व शिफारशी ३ महिन्यात शासनास सादर करावयात.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०१२११७१७०६२८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2022.01.21 17:17:23 +05'30'

**( संजय बनकर )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

(१) मा. राज्यपाल, यांचे सचिव राजभवन मलबार हिल, मुंबई-३२
(२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२
(३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
(४) मा. मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
(५) मा. राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
(६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
(७) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
(८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
(९) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
(१०) विभागीय आयुक्त, कोकण / औरंगाबाद / अमरावती
(११) जिल्हाधिकारी, अमरावती / औरंगाबाद
(१२) उपायुक्त (महसूल), कोकण विभाग, कोकण
(१३) निवासी उपजिल्हाधिकारी, अमरावती, जि. अमरावती.
(१४) निवासी उपजिल्हाधिकारी, औरंगाबाद, जि. औरंगाबाद.
(१५) श्री. ज्ञानदेव डुबल, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य तलाठी संघ, मु.पो. सैदापूर, ता. कराड, जि. सातारा.
(१६) श्री. संजय अनव्हाने (मंडळ अधिकारी),कामठी, ता. कामठी, जि. नागपूर.
(१७) श्री. नारायण रावसाहेब गाढे (तलाठी), तलाठी, नांदेड शहर, जि. नांदेड.
(१८) श्री. महेश सुर्यवंशी (तलाठी), चाफोडी, ता. करवीर, जि. कोल्हापूर.
(१९) निवडनस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२